**प्रशासकीय मान्यता-**
कोरपना,जि. चंद्रपूर येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.),यांचेकरिता निवासस्थान बांधण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१७१०/५२/प्र.क्र.२७/का-१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दि २ जूलै,२०१०.

**पहा:**-१) प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे),मुंबई यांचे पत्र क्र .बी(डब्ल्यू)६०४१/२००७,दि.५/१/२००९,
२) प्रमुख जिल्हा न्यायाधिश,चंद्रपूर यांचे पत्र क्र.बांधकाम/३३३४/२००९,दि.३१/८/२००९.

शासन निर्णय :-कोरपना,जि. चंद्रपूर येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांचेकरिता एक निवासस्थान बांधण्याच्या रु.३३,९५,६६०/-( रु.तेहत्तीस लाख पंच्याण्णव हजार सहाशे साठ फक्त) इतक्या अंदाजित खर्चास खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये)

| अ.क्र. | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | २७,६४,७२८ |
| २ | आकस्मिक खर्च (४%) | ८१,६०६ |
| ३ | पाणी पुरवठा व मलनिस्सारण (८%) | १,६३,२१२ |
| ४ | विद्युतीकरण (११%) | २,२४,४१६ |
| ५ | भाववाढीसाठी (५%) | १,६१,६९८ |
| | एकूण | ३३,९५,६६० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

अ) "काम सुरू करण्यापुर्वी जमिनीच्या मालकीहक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी."
ब) "अंतर्गत रस्ते,संरक्षक भिंत इत्यादी बांधकामांची छेद नकाशासह मापे विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करुनच काम सुरु करावे."
क) "मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेवूनच काम सुरु करावे."

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६-गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-१६३/इमा-२, दि.२०.५.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम

नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षणे-२ ), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, चंद्रपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,चंद्रपूर ,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,चंद्रपूर
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चंद्रपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर,
उप कोषागार अधिकारी, कोरपना,जि.चंद्रपूर,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,(१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, बी-२१/१,अंबाझरी रोड,अंध विद्यालयाजवळ,नागपूर-४४० ०२२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.